जिल्हा परिषद शिक्षकांच्या संगणकीय ऑनलाईन पध्दतीने होणाऱ्या जिल्हांतर्गत व आंतरजिल्हा बदलीसंदर्भात अभ्यासगट गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः जिपब-२०२२/प्र.क्र.२९/आस्था-१४
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : १४ मार्च, २०२३.

वाचा : १) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. जिपब ४८१९/प्र.क्र.७१७/आस्था.१४, दि. ०४.०२.२०२०.
२) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र.जिपब ४८२०/प्र.क्र.२९०/आस्था.१४,दि. ०७.०४.२०२१.
३) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र.आंजिब ४८२०/प्र.क्र.२९१/आस्था.१४ दि.०७.०४.२०२१.
४) शासन पत्र क्रमांक. जिपब २०२२/प्र.क्र.२९/आस्था.१४, दि. १३.०१.२०२३

**प्रस्तावना -**

संदर्भ क्र.१ येथील दि.०४.०२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषद शिक्षकांच्या जिल्हांतर्गत तसेच आंतरजिल्हा बदल्यांसाठी कार्यान्वित केलेल्या संगणकीय बदली प्रक्रियेचा अभ्यास करुन त्यामध्ये काही सुधारण करणे, अथवा सुधारित धोरण निश्चित करणे गरजेचे आहे काय, याबाबत अभ्यास करुन शिफारस करण्यासाठी श्री. आयुष प्रसाद (भाप्रसे), मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास गट स्थापन करण्यात आला आहे. सदर अभ्यासगटाने केलेल्या शिफारशीस अनुसरुन विद्यार्थ्यांची शैक्षणिक गुणवत्ता, जिल्हा परिषद शाळांमधील घटणारी पटसंख्या, अध्यापनातील स्थैर्य, शिक्षकांना अध्यापनाचे काम करतांना उद्भवणाऱ्या अडचणी विचारात घेऊन, जिल्हा परिषद शिक्षकांच्या जिल्हांतर्गत/आंतरजिल्हा बदल्यांसाठी दिनांक ७.४.२०२१ रोजीच्या संदर्भ क्र.२ येथील स्वतंत्र शासन निर्णयानुसार सुधारित धोरण निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार राज्यातील जिल्हा परिषद शिक्षकांच्या आंतरजिल्हा बदल्या ह्या संगणकीय प्रणालीद्वारे ऑनलाईन पध्दतीने करण्यात आलेल्या आहेत. तसेच जिल्हांतर्गत बदल्यांबाबतची कार्यवाही सद्यस्थितीत सुरु आहे.

सदर ऑनलाईन बदली प्रक्रिया राबविताना प्रत्येक टप्प्यावर विविध शिक्षक संघटनांकडून अनेक सूचना/निवदने शासनास प्राप्त झाले आहेत . तसेच शासन निर्णय दि.०७.०४.२०२१ मधील तरतूदी

आव्हानित करणाऱ्या विविध रिट याचिका मा .उच्च न्यायालयाच्या विविध खंडपीठांमध्ये दाखल करण्यात आलेल्या आहेत. यासंदर्भातील गांभीर्य विचारात घेवून रिट याचिका क्र. ६७७/२०२३ मध्ये संदर्भ क्र.४ येथील दि.१३.०१.२०२३ रोजीच्या पत्रान्वये मा .उच्च न्यायालयासमोर शासनाने मांडलेल्या भूमिकेस अनुसरुन जिल्हा परिषद शिक्षकांच्या संगणकीय ऑनलाईन पध्दतीने होणाऱ्या आंतरजिल्हा व जिल्हांतर्गत बदल्यांबाबत शासन निर्णय दि.०७.०४.२०२१ मधील तरतूदी व त्याअनुषंगाने प्राप्त सूचना/निवेदने याबाबत अभ्यासगटाकडून शिफारशी घेणे आवश्यक आहे . तथापि, संदर्भ क्र.१ येथील दि.०४.०२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये गठित अभ्यासगटातील सदस्यांची बदलीने अन्य पदांवर पदस्थापना झालेली आहे . त्यामुळे नव्याने अभ्यासगट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दिनांक ०४.०२.२०२० रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. शासन निर्णय दि.०७.०४.२०२१ रोजीच्या जिल्हा परिषद शिक्षकांच्या जिल्हांतर्गत तसेच आंतरजिल्हा बदलीच्या प्रचलित संगणकीय बदली प्रक्रियेचा अभ्यास करुन त्यामध्ये काही सुधारणा करणे आवश्यक आहे काय अथवा सुधारित धोरण निश्चित करणे गरजेचे आहे काय , याबाबतचा अभ्यास करुन त्या अनुषंगाने शासनास शिफारस करण्यासाठी शासन खालीलप्रमाणे नवीन अभ्यासगट गठीत करीत आहे.

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे : अध्यक्ष

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक : सदस्य

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड. : सदस्य

४) उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण : सदस्य

५) उपसचिव, जिल्हा परिषद आस्थापना, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई : सदस्य

६) अवर सचिव, आस्था १४ कार्यासन, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई : सदस्य सचिव

२. सदर अभ्यासगटाने प्रातिनिधीक स्वरुपात काही शिक्षक संघटनांच्या प्रतिनिधींशी चर्चा करुन त्यांच्या समस्या जाणून घ्याव्यात. तसेच काम करताना त्यांना बदल्यांसंदर्भात येणाऱ्या अनुभवांचा उपयोग करुन व

प्रातिनिधीक शिक्षक संघटनांकडून चर्चेमधून प्राप्त होणारी माहिती यासंदर्भातील विविध न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा.न्यायालयाने दिलेले निर्देश, संगणकीय प्रणाली तयार करणारी Vinsys IT Services (I) Pvt. Ltd चे अधिकारी यांना सन २०२२ ची प्रक्रिया राबविताना आलेल्या अडचणी , सन २०२२ ची प्रक्रिया राबविताना शासनाने वेळोवेळी दिलेली स्पष्टीकरणे याचा तौलनिक अभ्यास करुन शासनाच्या उपरोक्त नमूद शासन निर्णयानुसार कार्यान्वित असलेल्या बदल्यांच्या धोरणासंदर्भात आवश्यक त्या शिफारशी करणे तसेच सन २०२३ च्या आंतरजिल्हा व जिल्हांतर्गत बदली प्रक्रियेचे संभावित वेळापत्रक सादर करणे अभिप्रेत आहे. याबाबतचा अहवाल सदर अभ्यासगटाने एका महिन्यात शासनास सादर करावयाचा आहे.

३. सदर अभ्यासगटाच्या विचारार्थ सादर करावयाची निवेदने दि. २७.०३.२०२३ ते दि. २९ .०३.२०२३ या कालावधीत ग्रामविकास विभागाकडे सादर करावीत. तद्नंतर प्राप्त झालेल्या निवेदने विचारात घेतली जाणार नाहीत. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर बाब सर्व शिक्षक संघटनांच्या निदर्शनास आणावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३१४११३६३९४२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prashant Patil

Digitally signed by Prashant Patil
DN: cn=Prashant Patil, o=Rural development Department, ou, email=prashant.patil@nic.in, c=IN
Date: 2023.03.21 15:38:12 +05'30'

( प्रशांत पाटील )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) सर्व सन्माननीय विधान परिषद / विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य

६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.

७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव

८) सर्व विभागीय आयुक्त

९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, नाशिक, बीड,

११) उपसचिव, जिल्हा परिषद आस्थापना, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१२)उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व विभाग)

१३) निवड नस्ती-आस्था.१४.